**सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सर्वसाधारण प्रवर्ग) या योजनेअंतर्गत ३१ – सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालील अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग

## शासन निर्णय क्र. मुरोनि-२०२४/ प्र.क्र.१११/ उद्योग-७

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक २९/०३/२०२५

**वाचा:-**
१. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. योजना-२०१९/प्र.क्र.१२१/उद्योग-७, दिनांक ०१/०८/२०१९.
२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१९/ प्र.क्र.१७७/ उद्योग-७, दिनांक ३१/०८/२०१९
३. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना-२०१९/प्र.क्र.२३०/उद्योग-७, दिनांक २३/०१/२०२०.
४. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना-२०२२/प्र.क्र.१०९-अ/उद्योग-७, दिनांक ११/११/२०२२.
५. उद्योग सह संचालक (CMEGP), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ मुंरोनिका/ स. सा.प्र.रू.१९९.३६ को./२०२४-२५/ अे-१७८, दिनांक २४/०२/२०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील शहरी व ग्रामीण क्षेत्रातील सुशिक्षित युवक-युवतींची वाढती संख्या व उद्योग, व्यवसाय क्षेत्रात राज्यात विविध क्षेत्रात स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी उपलब्ध होत आहेत. या स्वयंरोजगार व रोजगाराच्या नवीन संधी विचारात घेऊन उद्योजकतेला चालना देणारी व सर्जनशिलतेला कालानुरुप वाव देणारी ‘मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम’(CMEGP) ही सर्वसमावेशक योजना दिनांक ०१/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील शहरी व ग्रामीण युवक-युवतींना स्वयंरोजगाराच्या विविध संधी उपलब्ध होण्यासाठी व योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय संनियंत्रण समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत.

**२.** CMEGP योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रमुख अंमलबजावणी संस्था (नोडल संस्था) म्हणून उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालय, मुंबई हे कार्यालय आहे. तसेच उद्योग संचालनालयाच्या अंतर्गत कार्यरत जिल्हा उद्योग केंद्र तसेच खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचेअंतर्गत कार्यरत जिल्हा खादी व ग्रामोद्योग कार्यालय या कार्यक्रम अंमलबजावणी संस्था आहेत. सदर योजनेची अंमलबजावणी पूर्णत: ऑनलाईन पद्धतीने करण्यात येत आहे.

**३.** उद्योग संचालनालयाच्या दिनांक २४/०२/२०२५ रोजीच्या प्रस्तावानुसार, CMEGP योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील मार्जिन मनी वितरणासाठी प्रलंबित ९९४३ प्रस्तावांकरीता आवश्यक रुपये १९९.३६ कोटी इतका निधी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्याकडे विनंती करण्यात आली होती. त्याअनुषंगाने रुपये १६८ कोटी इतका निधी वितरीत करण्यास वित्त

विभागाने मान्यता दिलेली आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सर्वसाधारण प्रवर्ग) योजनेंतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून मार्जिन मनी म्हणून वितरणाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या रुपये १६८ कोटी इतक्या अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सर्वसाधारण प्रवर्ग) या योजनेअंतर्गत मार्जिन मनी वितरणासाठी प्रलंबित प्रस्तावांकरीता, या योजनेतील तरतूदीनुसार, रुपये १६८,००,००,०००/- (रुपये एकशे अडुसष्ट कोटी फक्त) इतक्या राज्य शासनाच्या सहभाग अनुदानाच्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**२.** सदर रुपये १६८,००,००,०००/- इतकी अनुदानाची रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

**३.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

a) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम या योजनेची राज्यामध्ये अंमलबजावणी करणेबाबत शासन निर्णय दिनांक ०१/०८/२०१९ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून यामध्ये अर्ज प्रक्रिया व प्रकल्प मंजूरी अंतर्गत करावयाची कार्यवाही, योजनेची अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण व विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे. तसेच दिनांक ११/११/२०२२ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे सदर योजनेमध्ये सुधारणा करण्यात आलेल्या आहेत.
b) सदर योजनेअंतर्गत प्राप्त झालेला निधी मंजूरी प्राप्त प्रकल्पांच्या प्राधिकृत बँक खात्यामध्ये थेट जमा होणार आहे.
c) यापूर्वी वितरीत केलेल्या ७५ टक्के निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झालेले आहे.
d) वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षकांकडून कोणतेही आक्षेप उपस्थित करण्यात आलेले नाहीत.
e) सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

**४.** सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च, 'सर्वसाधारण घटकासाठी मागणी क्र. के-७, २८५१- ग्रामोद्योग व लघु उद्योग, १०२ लघु उद्योग, (००) (२५) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) (२८५१ ६६४५), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)' या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात येईल. तसेच सदर प्रयोजनार्थ होणारा प्रत्यक्ष खर्च निधी वितरणाच्या अधीन राहून करण्याची दक्षता घेण्यात येईल.

**५.** सदर शासन निर्णय प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (उद्योग) यांना दिनांक २४/०७/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१५५०१२०८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.29 15:50:46 +05'30'

**(अजित सासुलकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**,

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई - ३२. (शाईच्या मूळ ५ प्रती)

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, खादी व ग्रामोद्योग मंडळ, फोर्ट, मुंबई -०१.

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

६) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.

७) सर्व विभागीय उद्योग सह संचालक (उद्योग संचालनालयामार्फत).

८) सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (उद्योग संचालनालयामार्फत).

९) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६/ अर्थ-१४), मंत्रालय, मुंबई -३२.

१०) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई — ३२.

११) कक्ष अधिकारी (प्रशासन- १), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१२) निवडनस्ती (उद्योग-७).